प्रधान मंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत केंद्र पुरस्कृत सुक्ष्म सिंचन योजना सन २०१६-१७ मध्ये राज्यात राबविण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

## शासन निर्णय क्रमांकः प्रकृसिं-२११६/प्र.क्र.१४०/४अे

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०००३२
तारीख: ०३ मार्च, २०१७

वाचा

१) केंद्र शासनाने www.agricoops.nic.in या सांकेतिक स्थळावर निर्गमित केलेल्या राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत शेतावरील पाणी व्यवस्थापन या घटकाच्या मार्गदर्शक सुचना
२) शासन निर्णय क्रमांकः शाशेअ २०१४/प्र.क्र.८६/४अे, दि.२१/०४/२०१४
३) केंद्र शासनाचे पत्र क्र. F.No./११-३७/२०१४-Hort, दि.१४/०८/२०१४
४) केंद्र शासनाचे पत्र क्र. F.No./११-१०/२०१६-Hort, दि.२२/०२/२०१६
५) केंद्र शासनाचे पत्र क्र. F.No./ ११-१०/२०१६-Hort, दि.१३/०४/२०१६
६) संचालक (फलोत्पादन) यांचे केंद्र शासनास पाठविलेले पत्र क्र. Hort-४/AAP/PMKSY/१६-१७/४२२/२०१६, दि. २५ एप्रिल, २०१६
७) कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र.कृआआ-२०१६/ सुसिंयो/ प्र.कृ.सिं.यो./ प्रमा/ प्र.क्र.२५/ ४७३/ फलो-४, दिनांक ५ मे, २०१६.
८) केंद्र शासनाचे पत्र क्र. F.No.१९-६/२०१५-RFS-III, दि. ६ मे, २०१६
९) केंद्र शासनाचे पत्र क्र. F.No.२०-१५/२०१६-Hort, दि. २६ मे, २०१६
१०) राज्यस्तरीय मान्यता समितीच्या दि.२८.०७.२०१६ रोजीच्या बैठकीचे कार्यवृत्त.
११) शासन निर्णय क्रमांक प्रकृसिं-२११६/प्र.क्र.१४०/४अे, दि. १२ ऑगस्ट, २०१६
१२) शासन निर्णय क्रमांक प्रकृसिं-२११६/प्र.क्र.१४०/४अे, दि. १० जानेवारी, २०१७
१३) केंद्र शासनाचे पत्र क्र. F.No.२०-१५/२०१६/Hort, दि. १६ फेबुवारी, २०१७
१४) कृषी आयुक्तालयाचे पत्र क्र.कृआआ-२०१६/ सुसिंयो/ वि.मा./निवि/प्र.क्र.२९/१९९/ फलो-४, दिनांक २३ फेबुवारी, २०१७

प्रस्तावना

सुक्ष्म सिंचन योजना सन २०१४-१५ या वर्षात केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत - शेतावरील पाणी व्यवस्थापन उप अभियान म्हणून राबविण्यात आली. सदरहू उप अभियानामध्ये केंद्र व राज्य हिश्श्याचे प्रमाण ८०:२० असे होते. केंद्र शासनाने सन २०१५-१६ पासून, केंद्र पुरस्कृत सुक्ष्म सिंचन योजना, प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत प्रति थेंब अधिक पिक घटकाचा भाग म्हणून राबविण्याचे निश्चित केले. यामध्ये केंद्र राज्य हिश्श्याचे प्रमाण ६०: ४० असे निश्चित केले आहे.

केंद्र शासनाने, संदर्भाधीन अ.क्र. ४ येथील दि. २२ फेब्रुवारी, २०१६ च्या पत्रान्वये, महाराष्ट्र राज्यासाठी प्रधान मंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत केंद्र पुरस्कृत सूक्ष्म सिंचन योजना सन २०१६-१७ मध्ये राबविण्यासाठी केंद्र हिश्श्यापोटी रु.२५० कोटी एवढ्या रकमेचा नियतव्यय कळविला. त्यानुसार संचालक (फलोत्पादन) यांनी संदर्भाधीन अ.क्र. ६ येथील दि. २५ एप्रिल, २०१६ च्या पत्रान्वये केंद्र हिस्सा रु. २५०.०० कोटी व त्या प्रमाणात राज्य हिस्सा रु.१५८.३३ कोटी असा एकुण रु.४०८.३३ कोटी एवढ्या रकमेचा कार्यक्रम केंद्र शासनास सादर केला. संदर्भाधीन अ.क्र. ५ येथील दि. १३ एप्रिल, २०१६ च्या पत्रान्वये केंद्र शासनाने कळविलेल्या नियतव्ययाच्या कार्यक्रमास केंद्र शासनाची प्रशासकीय मान्यता कळवून कार्यक्रमाच्या अंमलबजावणीस अनुमती कळविलेली आहे. .

संदर्भाधीन अ.क्र.८ येथील दि. ६ मे, २०१६ च्या पत्रान्वये, केंद्र शासनाने सन २०१६-१७ या वर्षासाठी प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेच्या मार्गदर्शक सुचनातील परिच्छेद ७ नुसार आवश्यक असलेल्या जिल्हा सिंचन आराखडे, राज्य सिंचन आराखडा सादर करण्यापासून सूट देऊन सन २०१६-१७ या वर्षाचा कार्यक्रम राज्यस्तरीय मान्यता समितीच्या मान्यतेने राबविण्यास अनुमती दिलेली आहे. त्यानुसार, प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेच्या राज्यस्तरीय मान्यता समितीने, केंद्र पुरस्कृत सूक्ष्म सिंचन योजना (PMKSY) (प्रति थेंब अधिक पिक) घटकाच्या केंद्र हिस्सा रु.२५० कोटी व त्याप्रमाणात राज्य हिस्सा रु.१५८.३३ कोटी अशा एकुण रु.४०८.३३ कोटी एवढ्या रकमेच्या कार्यक्रमास दि.२८ जुलै, २०१६ च्या बैठकीत मान्यता दिलेली आहे. केंद्र शासनाने प्रधानमंत्री कृषी सिंचन योजनेंतर्गत प्रति थेंब अधिक पिक घटकाखालील केंद्र पुरस्कृत सूक्ष्म सिंचन योजनेच्या सन २०१६-१७ या वर्षात अंमलबजावणीसाठी संदर्भाधीन अ.क्र. ९ येथील दि. २६ मे, २०१६ च्या पत्रान्वये, पहिल्या हप्त्यापोटी सर्वसाधारण प्रवर्गासाठी रु.११७ कोटी, अनुसूचित जातीसाठी रु.१८ कोटी व अनुसूचित जमातीसाठी रु.१५ कोटी असा एकूण रु. १५० कोटी एवढा निधी वितरीत केला आहे. सदर निधीपैकी सर्वसाधारण प्रवर्गासाठी रु.११७.०० कोटी एवढा निधी संदर्भाधीन अ.क्र.११ येथील दि. १२ ऑगस्ट, २०१६ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. अनुसूचित जातीचा रु.१८.०० कोटी एवढा निधी संदर्भाधीन अ.क्र. १२ येथील दि. १० जानेवारी, २०१७ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे.

केंद्र शासनाने संदर्भाधीन अ.क्र. १३ येथील दि. १६ फेब्रुवारी, २०१७ च्या पत्रान्वये सर्वसाधारण प्रवर्गासाठी रु.८५.८० कोटी व अनुसूचित जाती प्रवर्गासाठी रु. ११.७० कोटी एवढा निधी वितरीत केला आहे. केंद्र शासनाने दुसऱ्या हप्त्यापोटी सर्वसाधारण प्रवर्गासाठी वितरीत केलेला रु.८५.८० कोटी एवढा निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय:

१. प्रधान मंत्री कृषी सिंचन योजनेच्या प्रति थेंब अधिक पिक घटकांतर्गत केंद्र पुरस्कृत सुक्ष्म सिंचन योजना सन २०१६-१७ मध्ये राबविण्याकरीता, रु.८५८० लक्ष (अक्षरी रु. पंच्याऐंशी कोटी ऐंशी लक्ष फक्त) एवढ्या निधीच्या कार्यक्रमास शासनाची वित्तिय मान्यता देण्यात येत आहे.

२.  सदर खर्च खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०१६-१७ च्या मंजुर तरतुदीत भागविण्यात यावा.

मागणी क्र. डी-३
२४०१, पिक संवर्धन
११३, कृषि अभियांत्रिकी
(००) (०७) प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना- (सूक्ष्म सिंचन) (केंद्र हिस्सा)
(२४०१ २५०४)
३३, अर्थसहाय्य

३.  या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेल्या केंद्र हिश्श्याच्य प्रमाणात आवश्यक राज्य हिश्श्याच्या जिल्हा नियोजन समितीच्या अखत्यारीतील तरतूदीस वित्तिय मान्यता, संबंधित जिल्हाधिकारी यांचेकडून देण्यात येईल.

४.  सदर निधी खर्च करताना राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाच्या - शेतावरील पाणी व्यवस्थापन उप अभियान घटकाच्या तसेच संदर्भाधीन अ.क्र.११ येथील दि. १२ ऑगस्ट, २०१६ च्या शासन निर्णयातील अटी, शर्ती व कार्यपद्धतीचे पालन करण्यात यावे.

५.  सदर निधी सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात खर्च होईल, याची दक्षता घ्यावी.

६.  सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/२००१/वित्तीय सुधारणा, दिनांक २० एप्रिल, २०१६ च्या शासन परिपत्रकातील अटींच्या पालनेच्या अधीन राहून व वित्त विभागाचे परीपत्रक क्र.पूरक-२०१६/प्र.क्र.१२८/अर्थसंकल्प-३, दिनांक १२ ऑगस्ट, २०१६ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०३१६५७४९५४०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sugriv Sambhaji Dhapate

Digitally signed by Sugriv Sambhaji Dhapate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, cn=Sugriv Sambhaji Dhapate
Date: 2017.03.03 17:04:48 +05'30'

**(सु.सं.धपाटे)**
**उपसचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) आयुक्त (कृषी),कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती)
२) मा.मंत्री (कृषी व पणन) यांचे खाजगी सचिव
३) मा.राज्यमंत्री (कृषी व पणन) यांचे खाजगी सचिव
४) प्रधान सचिव (कृषी) यांचे स्विय सहायक
५) सचिव (ग्रामविकास), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

६) सचिव (ला.क्षे.वि.), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
७) सचिव (रोहयो व जलसंधारण), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८) जिल्हाधिकारी (सर्व)
९) मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व जिल्हा परिषदा)
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी,वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणा,पुणे
११) सर्व संचालक, कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
१२) विभाग प्रमुख, एकात्मिक जल व्यवस्थापन, महात्मा फुले कृषी विद्यापिठ, राहुरी
१३) विभाग प्रमुख, सिंचन व निचरा अभियांत्रिकी, महात्मा फुले कृषी विद्यापिठ, राहुरी
१४) विभाग प्रमुख, सिंचन व निचरा अभियांत्रिकी, वसंतराव नाईक मराठवाडा कृषी विद्यापिठ, परभणी
१५) विभाग प्रमुख, सिंचन व निचरा अभियांत्रिकी, डॉ बाळासाहेब सावंत कोकण कृषी विद्यापिठ, दापोली
१६) विभाग प्रमुख, सिंचन व निचरा अभियांत्रिकी, डॉ.पंजाबराव देशमुख कृषी विद्यापिठ, अकोला
१७) सर्व विभागीय कृषी सहसंचालक
१८) जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी (सर्व)
१९) सर्व कृषी विकास अधिकारी/सर्व उपविभागीय कृषी अधिकारी/सर्व तालुका कृषी अधिकारी/
२०) सर्व मंडळ कृषी अधिकारी
२१) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
२२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण) महाराष्ट्र -१/२ मुंबई/नागपुर
२३) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
२४) संचालक, लेखा व कोषागार, मुंबई
२५) मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई, वाशी.
२६) उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,कोकण/नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपुर
२७) उप संचालक, लेखा व कोषागारे कोकण/नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपुर
२८) सर्व कार्यासने व पर्यवेक्षिय अधिकारी (कृषी) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
२९) निवडनस्ती.